**नियंत्रक, वैध मापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे आस्थापनेवर मेसर्स क्रिष्णा मोटर्स प्रोव्हायडिंग मॅनपॉवर सर्व्हिस, जोगेश्वरी, मुंबई या कंत्राटदाराकडून बाह्ययंत्रणेद्वारे ३ वाहन चालकांची सेवा उपलब्ध करून देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: वैमाशा-२०२३/प्र.क्र. ७९/ग्रासं-३**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई-४०००३२
दि: ०५ ऑगस्ट, २०२४

**वाचा -:** १) अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण-१०१७/प्र.क्र.१५६/ ना.पु.१२, दिनांक १८ एप्रिल, २०२२

२) अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, शासन निर्णय क्र.वैमाशा-२०२१/प्र.क्र.१५/ ग्रासं-३, दिनांक २७ जूलै, २०२२

३) अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, शासन निर्णय क्र.वैमाशा-२०२३/प्र.क्र.७९/ ग्रासं-३, दिनांक ३० जून, २०२३ , दिनांक १४ सप्टेंबर, २०२३, दिनांक १७ मे, २०२४

४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०२२/प्र.क्र.१५/आ.पु.क, दिनांक २७ एप्रिल, २०२२

५) नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांचे पत्र क्र.मंपाआ ०९/१५२३/प्र.क्र.१२६/वैमाशा-५/६२३, दिनांक ३० जुलै, २०२४

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्र. १ येथील दिनांक १८ एप्रिल, २०२२ च्या शासन निर्णयान्वये अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या अधिनस्त नियंत्रक, वैध मापन शास्त्र, मुंबई या कार्यालयातील पदांचा सुधारित आकृतीबंध निश्चित केला आहे. सदर आकृतीबंधामध्ये वाहन चालकांची एकूण १३ पदे मृत संवर्ग म्हणून घोषित करण्यात आलेली असून सदरची पदे बाह्य यंत्रणेद्वारे भरण्याबाबत मान्यता दिलेली आहे. त्यानुसार संदर्भ २ च्या शासन निर्णयान्वये नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांच्या आस्थापनेवर मे.क्रिष्णा मोटर्स प्रोव्हायडिंग मॅनपॉवर सर्व्हिस, जोगेश्वरी, मुंबई या कंत्राटदाराकडून बाह्ययंत्रणेद्वारे ०२ वाहन चालकांची सेवा १२ महिन्यांसाठी उपलब्ध करून घेण्यास मान्यता देण्यात आली होती. त्याअनुषंगाने त्यांच्याकडून ०२ वाहनचालक पुरविण्यात आले आहेत. उपरोक्त शासन निर्णयान्वये मे.क्रिष्णा मोटर्स प्रोव्हायडिंग मॅनपॉवर सर्व्हिस, जोगेश्वरी, मुंबई या कंत्राटदारासोबत केलेला करारनामा दि. २४/०५/२०२३ रोजी संपुष्टात आला आहे. यास्तव सदर कंत्राटदारास संदर्भ क्र.३ येथील दि.३०/०६/२०२३ च्या शासन निर्णयान्वये दि.२५/०५/२०२३ ते दि.२४/०८/२०२३ या ३ महिन्यांपर्यंत तसेच संदर्भ क्र. ३ येथील दि.१७/०५/२०२४ च्या शासन निर्णयान्वये दि.२५/०२/२०२४ ते दि. २४/०८/२०२४ पर्यंत किंवा सुधारित धोरणानुसार बाह्ययंत्रणेमार्फत वाहनचालकांची पदे भरण्याची कार्यवाही पूर्ण होईपर्यत यापैकी कमी असेल त्या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात आली आहे. शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक २७ एप्रिल, २०२२ अन्वये बाह्ययंत्रणेद्वारे मनुष्यबळ उपलब्ध करून घेण्यासाठी सुधारित सुचना निर्गमित करण्यात आलेल्या असून त्यानुसार मनुष्यबळ उपलब्ध करून घेण्याची कार्यवाही करण्यात येत आहे. सदर सुधारित सुचनानुसार बाह्ययंत्रणेद्वारे मनुष्यबळ उपलब्ध होण्यास अदयाप काही कालावधी लागणार आहे. त्याअनुषंगाने नियंत्रक, वैध मापन शास्त्र, मुंबई यांनी संदर्भ क्र. ५ येथील पत्रान्वये केलेल्या विनंतीनुसार त्यांच्या कार्यालयासाठी सद्यस्थितीत मे.क्रिष्णा मोटर्स प्रोव्हायडिंग मॅनपॉवर सर्व्हिस, जोगेश्वरी, मुंबई यांच्याकडून उपलब्ध झालेले ०२ वाहनचालकांच्या सेवेस तसेच तत्कालीन नियंत्रकांच्या बदलीमुळे रिक्त झालेल्या पदाचा अतिरिक्त कार्यभार सह सचिव,

अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचेकडे देण्यात आला असून सदरचा कार्यभार दि.१०/०७/२०२४ रोजी स्विकारल्यामुळे एका अतिरिक्त वाहन चालकाच्या सेवा उपलब्ध करुन घेण्यात आलेल्या आहेत. सदर वाहन चालकांच्या सेवेस कार्योत्तर मंजूरी देण्याचीबाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -:**

संदर्भ क्र. ३ येथील दिनांक १७ मे, २०२४ च्या शासन निर्णयान्वये दिलेल्या मान्यतेनुसार नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांच्या आस्थापनेवर मे. क्रिष्णा मोटर्स प्रोव्हायडिंग मैनपॉवर सर्व्हिस, जोगेश्वरी, मुंबई या एजन्सीकडून बाह्ययंत्रणेद्वारे दोन वाहनचालकांच्या सेवा उपलब्ध करून देण्यासाठी केलेल्या करारनाम्यास दिलेली मुदतवाढ दिनांक २५/०८/२०२४ रोजी संपुष्टात येणार आहे. यास्तव मे.क्रिष्णा मोटर्स प्रोव्हायडिंग मॅनपॉवर सर्व्हिस, जोगेश्वरी, मुंबई यांच्याकडून घेण्यात आलेल्या दोन वाहनचालकांच्या सेवा दिनांक २६/०६/२०२४ पासून पुढे ६ महिने तसेच नियंत्रकांच्या वाहनावर एका अतिरिक्त वाहनचालकाची सेवा दिनांक १०/०७/२०२४ पासून पुढे ६ महिने किंवा बाह्ययंत्रणेद्वारे नियुक्ती होई पर्यंतचा कालावधी या पैकी जे अगोदर घडेल त्या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदरचा शासन निर्णय हा वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३ विनियम, भाग-२, दिनांक १७/०४/२०१५ मधील, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, उपविभाग-चार खर्चाच्या संकीर्ण बाबीमधील अ.क्र.११ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०३. यासाठी होणारा खर्च मागणी क्र.एम-३, मुख्य लेखाशिर्ष ३४७५, इतर सर्वसाधारण आर्थिक सेवा (१०६) वजने व मापे यांचे विनियमन (००)(००)(०१) वजने व मापे विनियमन (नियंत्रक, उप नियंत्रक व सहायक नियंत्रक व वजने व मापे यांचे कार्यालय ) (अनिवार्य), (३४७५००९३)(१३) कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०८०५१४५३५८१००६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने .

KATIKAR PADMAVATI NARSINHA

Digitally signed by KATIKAR PADMAVATI NARSINHA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT,
2.5.4.20=f3ed7c4a70450333ddeb12360222b6eeba04baea8be7dd665a54ae68862230de, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=EC2D6C76E02D91EE9F71EFE012213AB98A56FDCC6BFFB5CE4EF3FAFA682EB741, cn=KATIKAR PADMAVATI NARSINHA
Date: 2024.08.05 15:08:39 +05'30'

**( पद्मावती काटीकर )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. नियंत्रक, वैध मापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. महालेखापाल (लेखापरीक्षा) १, महाराष्ट्र, मुंबई
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १, महाराष्ट्र, मुंबई
४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
५. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई
६. निवडनस्ती, कार्यासन ग्रा.सं.-३